वेतन आयोगाच्या अनुषंगाने निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्तीवेतनाबाबत येणा-या तक्रारींचे निवारण करण्यासाठी समन्वय अधिका-याची नियुक्ती करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय, क्रमांक : सेनिवे १०१०/प्र.क्र.१६/सेवा-४,
मंत्रालय,मुंबई -४०००३२,
दिनांक :- ९ जून, २०१०.

वाचा :- शासन वित्त विभाग परिपत्रक क्रमांक : सेनिवे १०१०/प्र.क्र.१६/सेवा-४,
दिनांक ३/२/२०१०.

राज्यातील निवृत्तीवेतन धारकांना येणा-या अडचणी/मिळणारे लाभ इत्यादीची माहिती मिळण्याकरिता वित्त विभागातील निवृत्ती वेतनविषयक कामकाज हाताळणारे श्री.र.आ.नागरगोजे, अवर सचिव यांची समन्वय अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच सदर परिपत्रकान्वये सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना अशा सूचना देण्यात आल्या आहेत की, खुद्द प्रशासकीय विभाग व त्यांच्या विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयातील निवृत्ती वेतनधारकांच्या अडचणींचे / तक्रारींचे निवारण करण्यासाठी अवर सचिव दर्जाचा अधिकारी नियुक्त करुन त्यांचे नाव, कार्यालयीन दूरध्वनी क्रमांक, मोबाईल क्रमांक व मंत्रालयातील दालन क्रमांक या माहितीसह परिपत्रक तात्काळ निर्गमित करावे व त्याची प्रत या विभागास पृष्ठांकित करावी. तथापि याबाबत केलेल्या कार्यवाहीची माहिती ब-याच विभागाकडून अद्याप प्राप्त झालेली नाही. तरी या परिपत्रकान्वये पुन:श्च सूचित करण्यात येत आहे की, ज्या विभागांनी याप्रमाणे कार्यवाही अद्याप केलेली नाही त्या विभागांनी सदर कार्यवाही **विनाविलंब** करुन त्याप्रमाणे या विभागास कळविण्यात यावे.

२. सर्व निवृत्तीवेतन धारक/कुटुंब निवृत्तीवेतनधारक यांनी त्यांच्या तक्रारी संदर्भात ते मंत्रालयातील ज्या प्रशासकीय विभागाच्या आस्थापनेवरुन सेवानिवृत्त झाले असतील त्या विभागातील समन्वय अधिका-याकडे संपर्क साधावा आणि फक्त धोरणात्मक बाबींच्या

विचारणेबाबत वित्त विभागाकडे संपर्क साधावा.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१००६१०१७५४२४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अ.मु. सोलेगांवकर)
शासनाचे सह सचिव.

प्रति,

सर्व मंत्रालयीन विभाग.